**केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य, तेलताड व मका विकास कार्यक्रम (Integrated Scheme of Oilseed, Oilpalm and Maize - ISOPOM) सन २०११ -१२ मध्ये राबविण्यास वित्तीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आयएसओपी -१६११/ प्र.क्र. १३८/४-अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- ०३ सप्टेंबर, २०११**

**संदर्भ: -**१) केंद्र शासन कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. २-११/ २०११-P/TMOP, दि. १८ मे,२०११,
२) शासन निर्णय समक्रमांक, दि. ०७ जून, २०११
३) केंद्र शासन कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. १४-२/ २०११-CA-II( Pt.२), दि. २७ जुन, २०११
४) केंद्र शासन कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. १४-१/ २०११-CA-II, दि. ०८ जुलै,२०११,
५) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र. कृ.आ. / विप्र-२/ आयसोपॉम/प्रशा.वित्तीय मान्यता /३७६/२०११, दि.२०/७/२०११
६) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र. कृ.आ. / फलो- १/ रोहयो / आयसोपॉम / १९४४ / ११, दि.२२ /७ /२०११

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय गळीत धान्य उत्पादन कार्यक्रम, राष्ट्रीय कडधान्य विकास कार्यक्रम व गतीमान मका विकास कार्यक्रम राज्यात सन १९९५-९६ पासून राबविण्यात येत आहे. सन २००४-०५ पासून सर्व कार्यक्रम एकत्रित करुन केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य, कडधान्य, तेलताड व मका विकास कार्यक्रम (Integrated scheme of Oildseed, Pulses, Oilpalm and Maize-ISOPOM) ही योजना **कडधान्य** हा घटक वगळता अन्य घटकांसाठी राज्यात राबविण्यात येत आहे. या योजनेच्या निधीत केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण ७५:२५ असे आहे.

सन २०१०-११ पासून तेलताड या घटकाचा, या योजने अंतर्गत केंद्र शासनाने प्रस्तावित केल्याप्रमाणे समावेश करण्यात आला आहे. तसेच सन २०१०-११ पासून कडधान्य विकास कार्यक्रम या योजनेचा राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियाना अंतर्गत समावेश करण्यात आला आहे.

केंद्रीय कृषि मंत्रालयाच्या संदर्भाधीन दिनांक १८ मे, २०११ च्या पत्रान्वये सन २०११-१२ मध्ये केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य, तेलताड व मका विकास कार्यक्रम (Integrated Scheme of Oilseed, Oilpalm and Maize-ISOPOM) राज्यात राबविण्यासाठी रु. १२७४४.११८० लक्ष ( रु. एकशे सत्तावीस कोटी चव्वेचाळीस लक्ष अकरा हजार आठशे फक्त) कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे. सदर निधीच्या कार्यक्रमास संदर्भाधीन अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन अ.क्र.४ दि. ०८ जूलै, २०११ च्या पत्रान्वये पहिल्या हप्त्यापोटी रू. ६०००.०० लाख निधी वितरित करण्यास मंजूरी दिली आहे. त्याचप्रमाणे केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन अ.क्र.३ दि. २७ जून, २०११ च्या पत्रान्वये सन २०१०-११ मधील अखर्चित रक्कम रू. १५०.४३ लाख पुर्नजिवित केली आहे. सदर योजनेकरिता सन २०११-१२ साठी, केंद्र शासनाने मंजूर केलेल्या रू. ६०००.०० लाख, सन २०१०-११ मधील पुर्नजिवित केलेली अखर्चित रक्कम रू. १५०.४३ लाख व आयुक्तालय स्तरावर बियाणे या

बाबीसाठी राज्यहिश्श्याची रक्कम रू. ६१८.७५ लाख असे एकूण मिळून रू. ६७६९.१८ लाख ( रू. सदुसष्ट कोटी एकोणसत्तर लाख अठरा हजार फक्त ) निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०११ - १२ या वर्षासाठी केंद्र शासनाने त्यांचे संदर्भाधीन पत्र दिनांक ०८ जुलै,२०११, अन्वये केंद्र पुरस्कृत " आयोसोपाम " योजनेअंतर्गत एकात्मिक गळीतधान्य, तेलताड व मका विकास कार्यक्रम राबविण्यास पहिल्या हप्त्यापोटी रु. ६०००.०० लाख निधीस मंजूरी दिलेली आहे. त्याचप्रमाणे २७ जुन, २०११ च्या पत्रान्वये सन २०१०-११ मधील अखर्चित रक्कम रू. १५०.४३ लाख पुनर्जिवित केली आहे. आयुक्तालय स्तरावर बियाणे या घटकासाठी खर्च करण्यासाठी कृषि आयुक्तालयाने राज्य हिश्श्याची रू. ६१८.७५ लाख निधीची मागणी केली आहे. केंद्र शासनाने दिलेली मान्यता व कृषि आयुक्तालयाने राज्य हिश्श्याची केलेली मागणी विचारात घेऊन एकात्मिक गळीतधान्य, तेलताड व मका विकास कार्यक्रम राज्यात राबविण्यासाठी एकूण रक्कम रू. ६७६९.१८ लाख ( रू.सदुसष्ट कोटी एकोणसत्तर लाख अठरा हजार फक्त ) निधीच्या कार्यक्रमास शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

केंद्र शासनाने पहिल्या हप्त्यापोटी मंजूरी दिलेल्या रू. ६०००.०० लाख निधीचे वर्गनिहाय वर्गीकरण खालीलप्रमाणे केले आहे. सदर योजना राबविताना नमूद केलेला निधी त्या- त्या वर्गातील लाभार्थ्यांसाठीच खर्च केला जाईल याची खबरदारी घ्यावी.

**( रू. लाखात )**

| अ.क्र. | वर्ग | वितरित केलेली रक्कम |
|---|---|---|
| १ | सर्वसाधारण / इतर | ४५४८.०० |
| २ | अनुसूचित जाती | ९७२.०० |
| ३ | अनुसूचित जमाती | ४८०.०० |
| | एकूण | ६०००.०० |

केंद्र शासनाने मंजूरी दिलेल्या रू. ६०००.०० लाख व सन २०१०-११ मधील पुनर्जिवित केलेली अखर्चित रक्कम रू. १५०.४३ लाख अशा एकूण ६१५०.४३ लाख निधीचा सदर योजनेअंतर्गत योजनानिहाय कार्यक्रम पुढीलप्रमाणे राहील:-

**(रु. लाखात)**

| **अ.क्र.** | **योजनेचे नांव** | **एकूण आवश्यक केंद्र हिस्सा** | **पहिला हप्ता व पुनर्जिवित रकमेतून वितरित करावयाची रक्कम** |
|---|---|---|---|
| १ | गळीत धान्य विकास कार्यक्रम | ८९४३.५२७५ | ५८४०.४३ |
| २ | मका विकास कार्यक्रम | ५७९.००६० | ३००.०० |
| ३ | तेलताड विकास कार्यक्रम | ११.५५५० | १०.०० |
| एकूण | | ९५३४.०८८५ | ६१५०.४३ |

२. या योजनेसाठी मंजूर केलेला रु. ६१५०.४३ लाख निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०११- १२ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**केंद्र हिस्सा ( ७५ टक्के)**

**मागणी क्रमांक डी-३** **(रु. लाखात )**

अ) २४०१, पीक संवर्धन, ११४, तेलबियाणे विकास
महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ याच्या कलम
१२३ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान ( स्थानिक क्षेत्रातील योजना ) ( अर्थोपाय व
आगाऊ रकमेशी समायोजन ) ( केंद्र हिस्सा )
(००) (१०) **तेलबिया विकास कार्यक्रम**
(२४०१ ४६६१) ३१ सहायक अनुदान १०००.००

ब)	२४०१,पीक संवर्धन
१९४ , तेलबियाणे विकास
केंद्र पुरस्कृत योजना ( केंद्र हिस्सा ७५ टक्के)
(०० ) ( ०६ ) **एकात्मिक तेलबिया उत्पादन कार्यक्रम**
(२४०१ २४९८) ३३- अर्थसहाय्य	४८४०.४३

क)	२४०१, पीक संवर्धन,
१०२,अन्नधान्य पिके
महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ याच्या कलम
१२३ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान ( स्थानिक क्षेत्रातील योजना ) ( अर्थोपाय व
आगाऊ रकमेशी समायोजन ) जिल्हा स्तर ( केंद्र हिस्सा )
(००) (२४) एकात्मिक मका उत्पादन कार्यक्रम
(२४०१ ४५६१) ३१ सहायक अनुदान	८६.००

ड)	२४०१, पीक संवर्धन,
१०२, अन्नधान्य पिके
(००) (१६) एकात्मिक मका उत्पादन कार्यक्रम- केंद्र पुरस्कृत योजना
( केंद्र हिस्सा ७५ टक्के ) (२४०१ ३५८३)	२१४.००
३३ - अर्थसहाय्य

इ)	२४०१ - पीक संवर्धन
(००) ( ११) तेलताड विकास ( उत्पादन ) कार्यक्रम , केंद्र पुरस्कृत
( केंद्र हिस्सा ७५ टक्के )
( २४०१ ८७५४ ) ३१ सहाय्यक अनुदान	१०.००

३.	या योजनेसाठी कृषि आयुक्तालय स्तरावरून राबविण्यात येणाऱ्या बाबीसाठी मंजूर केलेला राज्य हिस्सा रू. ६१८.७५ लाख निधी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०११-१२ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**राज्य हिस्सा ( २५ टक्के ) ( केंद्र पुरस्कृत गळीतधान्य विकास कार्यक्रम ) ( आयुक्तालय स्तर )**

**मागणी क्र. डी-३**	**(रु. लाखात )**

**अ)**	२४०१, पीक संवर्धन,
११४, तेलबियाणे
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
राज्य योजनांतर्गत योजना( राज्य हिस्सा २५ टक्के )
(००) (११४) तेलबियाणे
**(००)**
**(००) (०१) एकात्मिक तेलबिया उत्पादन कार्यक्रम**
(२४०१ १५३५) ३३ अर्थसहाय्य	६१८.७५

४.	केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि. १८ मे, २०११ च्या पत्रान्वये निर्गमित केलेल्या मागदर्शक सूचनानुसार व मंजूर केलेल्या कृति आराखड्यानुसार सन २०११-१२ मध्ये एकात्मिक गळीत धान्य,पामतेल व मका विकास कार्यक्रम राबविण्यात यावा.

५.	राज्य हिश्श्याच्या जिल्हा नियोजन व विकास समितीच्या अख्यत्यारितील तरतूदीस प्रशासकीय तसेच वित्तिय मान्यता संबंधित जिल्हयाधिकारी यांचेकडून देण्यात येतील.

६.	गळीत धान्य विकास व मका विकास कार्यक्रमाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी **संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे** यांनी व  तेलताड विकास कार्यक्रमाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी **संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे** यांनी, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून उद्दिष्टनिहाय सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रीय अधिका-यांना निर्गमित कराव्यात.या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी संदर्भाधीन अ.क्र. २ येथील दि. ७ जून, २०११ अन्वये निर्गमित केलेल्या शासन निर्णयामधील परिच्छेद ६ मधील i) ते vii) मधील बाबीचा अंतर्भाव करण्यात यावा.

७.	केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगतीचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याला ५ तारखेपर्यंत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

८.	**सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १५१ /११ /व्यय- १, दि. २५/८/२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.**

९.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करून दिला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०९०८१५०६१९००१** असा आहे

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**सही /-**
**( वि. मा. बिवलकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रती,

आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
संचालक ( फलोत्पादन ), कृषि आयुक्तालय, पुणे
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१
विभागीय आयुक्त (सर्व)
जिल्हाधिकारी, (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
मुख्या लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे, दुग्ध कॉलनी  गोरेगाव (पूर्व), मुंबई-६५
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३
सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभाग / आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
सर्व सह सचिव / उपसचिव / अवर सचिव, कृषि व पदुम विभाग (कृषि व फलोत्पादन प्रभाग)
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव
निवडनस्ती